**मुख्य अभियंता, गोसीखुर्द प्रकल्प, जलसंपदा विभाग, नागपूर या कार्यालयाच्या नियत अस्थायी आस्थापनेवरील पदांना दि. ०१/०३/२०२२ ते ३१/०८/२०२२ पर्यंत मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- मुदतवाढ -२०२२/प्र.क्र.५६/ मोप्र-(२)**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- ०४/०३/२०२२

संदर्भ- १) शासन निर्णय, जलसंपदा विभाग क्र.मुदतवाढ-२०२१/प्र.क्र.२१६/मोप्र-(२), दि. ०८/०९/२०२१
२) मुख्य अभियंता गोसीखुर्द प्रकल्प, जलसंपदा विभाग, नागपूर यांचे पत्र.क्र. जाक्र.२७२/मुअगोप्र/आ-२/२०२२, दिनांक २१/०१/२०२२
३) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक पदनि २०१६/प्रक्र.८/१६/आ.पु.क, दिनांक २२/०२/२०२२
४) शासन निर्णय पाटबंधारे विभाग, मंत्रालय, मुंबई, क्र.आढावा१००२/(३३५/२००२)आ(प्रशि), दि.०६/०२/२००३
५) शासन निर्णय, जलसंपदा विभाग क्रमांक आढावा २००८( ९९/२००८ )/भाग-२/( आ (प्रशि), दिनांक २९ मे, २००८ व शासन निर्णय, जलसंपदा विभाग क्र.आढावा २००८(९९/२००८)/भाग-२/आ (प्रशि), दिनांक ३० जून, २००९

**प्रस्तावना :-**

मुख्य अभियंता, गोसीखुर्द प्रकल्प, जलसंपदा विभाग, नागपूर या कार्यालयातील नियत अस्थायी आस्थापनेवरील ३० पदांची निर्मिती संदर्भाधिन क्रमांक ५ येथील शासन निर्णयान्वये करण्यात आली आहे. संदर्भीय क्र.१ च्या शासन निर्णयान्वये नियत अस्थायी आस्थापनेवरील ३० पदांना दिनांक २८/०२/२०२२ पर्यत चालू ठेवण्यास मंजूरी देण्यात आली आहे. संदर्भ क्रमांक ३ चे वित्त विभागाचे शासन निर्णयान्वये सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतिबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच यापूर्वी आढावा मंजूर केल्यावर निर्माण करण्यात आलेल्या परंतु ज्यांचा समावेश आकृतिबंधात करण्यात आलेला नाही अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दिनांक १/०३/२०२२ ते दिनांक ३१/०८/२०२२ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार देण्यात आले आहेत.

**शासन निर्णय :-**

मुख्य अभियंता, गोसीखुर्द प्रकल्प, जलसंपदा विभाग, नागपूर यांचे संदर्भ क्र. २ अन्वये प्रस्तावित केल्यानुसार आता मुख्य अभियंता, गोसीखुर्द प्रकल्प, जलसंपदा विभाग, नागपूर या कार्यालयातील नियत अस्थायी आस्थापनेवरील ३० पदांना सोबतच्या परिशिष्ट -अ मध्ये दर्शविल्याप्रमाणे दिनांक ०१/०३/२०२२ ते ३१/०८/२०२२ पर्यंत खालील अटींचे अधिन राहून मुदतवाढ देण्यात येत आहे.

१) उपरोक्त सर्व पदे विभागाने प्रस्तावित केलेल्या कालावधीत कार्यरत असतील.
२) रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवरील पदे कर्मचारी कार्यरत असे पर्यंत चालू राहतील.
३) सदर पदे आकृती बंधानुसार मंजुर असतील.
४) उपरोक्त सर्व पदे व्यपगत झालेली नसतील.
५) यानंतर शासनास सादर करण्यात येणारे विहित प्रपत्र प्रमाणपत्र त्या त्या कालावधीच्या दिनांकासहीत प्रस्ताव विहित प्रपत्र, प्रमाणपत्रासह सादर करण्यात यावेत.

उपरोक्त कार्यालयातील खर्च, मागणी क्रमांक आय-५ (नियत अस्थाई आस्थापना), मुख्य लेखाशीर्ष- ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधाऱ्यावरील भांडवली खर्च,८० सर्वसाधारण, (१९०) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका (०४) विविध पाटबंधारे विकास महामंडळास भाग भांडवली अंशदान (वेतन) (०४)(०२) विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळास भाग भांडवली अंशदान ( ४७०१ आय १७१) या लेखाशीर्षाखाली महामंडळास मंजूर असलेल्या नियत अस्थाई आस्थापनेच्या वेतनाखाली मंजूर असलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

३) हे आदेश वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क, दिनांक २२/०२/२०२२ अन्वये प्रशासकीय विभागास दिलेल्या प्राधिकारानुसार तसेच आंतरवित्त सल्लागार व उप सचिव यांचे सहमतीने निर्गमित करण्यांत येत आहे.

सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२२०३१७१२४९३७७१२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Abhay Keshaorao Yedsikar

Digitally signed by Abhay Keshaorao Yedsikar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5724dd2e45895f7c2ab554c8d0b0041f388e5f397467c37bb907e6cc635bd0fd, cn=Abhay Keshaorao Yedsikar
Date: 2022.03.17 13:21:24 +05'30'

सहपत्र- परिशिष्ट 'अ'

**( अभय येडसीकर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत- सहपत्रासह-

१)महालेखापाल २, महाराष्ट्र राज्य, (लेखा व अनुज्ञेयता) नागपूर,
२)महालेखापाल २, महाराष्ट्र राज्य, (लेखापरीक्षा ) नागपूर,
३)जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती
४)वित्त विभाग, व्यय-१२, मंत्रालय, मुंबई,
५)कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ,नागपूर
६) मुख्य अभियंता, गोसीखुर्द प्रकल्प, जलसंपदा विभाग, नागपूर यांना कळविण्यात येते की,

प्रस्तुत शासन निर्णयान्वये मंजुरी दिलेल्या अधिकारी/कर्मचारी यांच्या व्यतिरिक्त इतर अधिकारी/कर्मचारी यांची वेतन व देयके अदा केल्यास तसेच या शासन निर्णयान्वये दिलेल्या मंजूरीचा प्रत्यक्ष/अप्रत्यक्ष चुकीचा अर्थ लावून अन्य अधिकारी/कर्मचारी यांची वेतन देयके अदा केल्यास त्याची संपूर्ण जबाबदारी आहरण व संवितरण अधिका-यांवर राहील. त्याचप्रमाणे अस्थायी पदांना मुदतवाढ देत असताना, वित्त विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णयातील सूचना/अटींची पूर्तता होत असल्याबाबत खातरजमा करण्याबाबतची जबाबदारी आहरण व संवितरण अधिका-यांवर राहील.

## परिशिष्ट अ

शासन निर्णय क्र. मुदतवाढ -२०२२/प्र.क्र.५६/मोप्र-२, दिनाक ०४/०३/२०२२ चे सहपत्र
नियत अस्थायी आस्थापनेवरील खालील ३० पदांना दि.०१/०३/२०२२ ते दि.३१/०८/२०२२ पर्यंत मुदतवाढ

| अ.क्र. | पदनाम | आकृतिबंधानुसार मंजूर पदे | मुदतवाढ द्यावयाची पदे |
|---|---|---|---|
| | **तांत्रिक पदे** | | |
| १ | मुख्य अभियंता | १ | १ |
| २ | सहायक मुख्य अभियंता (कार्यकारी अभियंता) | २ | २ |
| ३ | उप अभियंता | ३ | ३ |
| ४ | कनिष्ठ अभियंता | ३ | ३ |
| ५ | विशेष अधीक्षक | १ | १ |
| ६ | अधीक्षक | १ | १ |
| ७ | मुख्य आरेखक | १ | १ |
| ८ | मुख्य दप्तर कारकून | १ | १ |
| ९ | प्रथम लिपिक | १ | १ |
| १० | वरिष्ठ लिपिक | २ | २ |
| ११ | कनिष्ठ लिपिक | २ | २ |
| १२ | लघुलेखक उच्चश्रेणी/निम्नश्रेणी | १ | १ |
| १३ | टंकलेखक | ३ | ३ |
| १४ | दूरध्वनीचालक | १ | १ |
| १५ | वाहनचालक | १ | १ |
| १६ | दप्तरी | १ | १ |
| १७ | नाईक | १ | १ |
| १८ | शिपाई | ३ | ३ |
| १९ | चौकीदार | १ | १ |
| | **एकूण** | **३०** | **३०** |
| | **एकूण मुदतवाढीची पदे -३०** | | |